प्रति,

पोलीस महासंचालक,
महाराष्ट्र राज्य, मुंबई
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हादंडाधिकारी,
सर्व पोलीस आयुक्त

क्र.बीसीआर ५३९९/११४/भाग-२/विशा-५

गृह विभाग(वि), मंत्रालय, मुंबई-३२
दिनांक १0 ऑगस्ट, २००४

**विषय:-महाराष्ट्र चित्रपटगृहे (विनियमन) नियम १९६६ मधील तरतुदीमध्ये सुधारणा करण्यात आल्याने त्याप्रमाणे अंमलबजावणी करणेबाबत**

उपरोक्त विषयास अनुसरुन कळविण्यात येते की, शासनाने मुंबई चित्रपटगृहे (विनियमन) अधिनियम, १९५३ मधील तरतुदीनुसार तयार करण्यात आलेल्या महाराष्ट्र चित्रपटगृहे (विनियमन) नियम, १९६६ मधील तरतुदीमध्ये शासन अधिसूचना दि.२२.०७.२००४ अन्वये सुधारणा केलेल्या आहेत सदर अधिसूचना महाराष्ट्र शासन राजपत्र (असाधारण) मध्ये दि.३१ जुलै, २००४ रोजी प्रसिध्द करण्यात आली आहे. सदर शासन राजपत्राच्या दोन प्रती सोबत पाठविण्यात येत आहे.

चित्रपटगृहासंबंधी यापुढे शासनास प्रस्ताव सादर करताना सदर अधिसूचनेनुसार प्रस्ताव तपासून शासनास सादर करावेत. सदर अधिसूचनेची प्रत आपल्या परिक्षेत्रातील कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, विद्युत निरिक्षक, उद्योग, उर्जा, कामगार विभाग, आरोग्य अधिकारी, अग्निशामक अधिकारी, यांनाही पाठवून चित्रपटगृहासंबंधी प्राप्त होणारे प्रस्ताव सदर अधिसूचनेनुसार तपासण्याबाबत संबंधितांना सूचित करण्यात यावे. तसेच शासन राजपत्राच्या प्रती ई-मेल व्दारेही पाठविण्यात आल्या आहेत. तसेच शासनाच्या maharashtra.gov.in या इंटरनेट संकेत स्थळावरही शासन निर्णय या विकल्पात उपलब्ध करुन दिलेल्या आहेत. सदर शासन पत्रासोबत शासन राजपत्राच्या प्रती प्राप्त न झाल्यास ई-मेल व्दारे तसेच शासनाच्या इंटरनेट संकेत स्थळावरुन अधिसूचनेच्या प्रती प्राप्त करुन घ्याव्यात.

उक्त नमूद सूचनांप्रमाणे तात्काळ अंमलबजावणी करण्याबाबत आवश्यक उपाययोजना करण्यात यावी. तसेच पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई व सर्व विभागीय आयुक्त यांनी त्यांच्या स्तरावरही आपल्या परिक्षेत्रातील जिल्हादंडाधिकारी व पोलीस आयुक्त यांना याबाबत सूचना द्याव्यात, ही विनंती.

(मा.दा.गोडबोले)
कक्ष अधिकारी, गृह विभाग(वि), महाराष्ट्र शासन

60\C:\Somu\2004\SPL-5\August\086

असा. क्र. १९४ रजिस्टर्ड नं. टीईसीएच/४७-३०३/एमबीआय/२००३-०५




# महाराष्ट्र शासन राजपत्र

**असाधारण**

**प्राधिकृत प्रकाशन**

**शनिवार, जुलै ३१, २००४/श्रावण ९, शके १९२६**

**स्वतंत्र संकलन म्हणून फाईल करण्यासाठी या भागाला वेगळे पृष्ठ क्रमांक दिले आहेत.**

## भाग चार-ब

**महाराष्ट्र शासनाने महाराष्ट्र अधिनियमांन्वये तयार केलेले (भाग एक, एक-अ आणि एक-ल यांमध्ये प्रसिद्ध केलेले नियम व आदेश यांव्यतिरिक्त) नियम व आदेश.**

### गृह विभाग

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक २२ जुलै २००४

**अधिसूचना**

**मुंबई सिनेमा (विनियमन) अधिनियम, १९५३.**

क्रमांक बीसीआर. ५३९९/११४/एसपीएल-५.---मुंबई चित्रपटगृहे (विनियमन) अधिनियम, १९५३ (१९५३ चा मुंबई ११) याच्या कलम ९ च्या पोट-कलम (१) व पोट-कलम (२) चे खंड (अ), (ब) आणि (क) द्वारे प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा व महाराष्ट्र शासनास त्याबाबतीत समर्थ करणाऱ्या इतर सर्व अधिकारांचा वापर करून, महाराष्ट्र शासन, याद्वारे, महाराष्ट्र चित्रपटगृहे (विनियमन) नियम, १९६६ मध्ये आणखी सुधारणा करण्यासाठी पुढील नियम करीत असून उक्त कलम ९ च्या पोट कलम ४ द्वारे आवश्यक असल्याप्रमाणे प्रसिद्ध करण्यात येत आहे.



[किंमत : रुपये ३.००]

भाग चार-ब--२३१

१. या नियमांना महाराष्ट्र चित्रपटगृहे (विनियमन) (पहिली सुधारणा) नियम, २००४ असे म्हणावे.

२. हे नियम **महाराष्ट्र शासन राजपत्रात** (भाग ४-ब) मध्ये प्रसिद्ध झाल्याच्या दिनांकापासून अंमलात येतील.

३. महाराष्ट्र चित्रपटगृहे (विनियमन) नियम, १९६६ (यात यानंतर ज्यांचा " मुख्य नियम " असा निर्देश करण्यात आला आहे.) याच्या नियम २ मधील खंड (फ) ऐवजी पुढील मजकूर दाखल करण्यात येईल :---

" (फ) " लायसनदार " किंवा " लायसनधारक " यामध्ये व्यवस्थापक किंवा अनेक व्यवस्थापक किंवा नोंदणीकृत कंपनीने किंवा भागीदारी संस्थेने नियम ११६ खाली नामनिर्देशित केलेली व्यक्ती किंवा महामंडळ यांचा समावेश होतो ; ".

४. मुख्य नियमांच्या नियम ३ मधील पोट-नियम (१) ऐवजी पुढील पोट-नियम दाखल करण्यात येईल :—

" (१) १८ वर्षांपेक्षा कमी वयाच्या कोणत्याही व्यक्तीला या नियमांअन्वये कोणतेही लायसन मिळविण्याचा किंवा धारण करण्याचा हक्क असणार नाही. एखाद्या कंपनीच्या बाबतीत, या नियमांखालील कोणतेही लायसन मिळविण्यासाठी किंवा धारण करण्यासाठी कंपनीचा कार्यकारी संचालक कंपनीच्या वतीने अर्ज करील. "

५. मुख्य नियमांच्या नियम ६ मधील पोट-नियम (३) नंतर पुढील पोट-नियम (४) जादा दाखल करण्यात येईल :—

" (४) नियम ६ खालील ना हरकत प्रमाणपत्र अर्जासोबत जोडलेले असल्याखेरीज विकास नियंत्रण विनियमाअंतर्गत (डीसीआर) चित्रपटगृहे बांधण्याच्या परवानगीसाठी अर्ज करण्यात येणार नाही. "

६. मुख्य नियमांच्या नियम ९ मध्ये,—

(१) पोट-नियम (१) ऐवजी पुढील पोट-नियम दाखल करण्यात येईल :—

" (१) चित्रपटगृहाच्या तळजमिनीची सर्वात खालची पातळी भूपातळीपासून ५० फुटांहून अधिक उंच होईल अशा पद्धतीने चित्रपटगृह बांधण्यात येणार नाही. "

(२) पोट-नियम (२) आणि (५अ) वगळण्यात येतील.

(३) पोट-नियम (३), (४), (५) आणि (६) यांना अनुक्रमे पोट-नियम (२), (३), (४) आणि (५) असे नवीन क्रमांक देण्यात येतील.

७. मुख्य नियमांच्या नियम १२ मध्ये,—

(एक) पोट-नियम (१) ऐवजी पुढील पोट-नियम दाखल करण्यात येईल :—

" (१) रंगमंचाच्या/पडद्याच्या समोरुन आणि जेथे ५०० पेक्षा अधिक नसतील इतक्या व्यक्तींसाठी आसनव्यवस्था असेल अशा श्रोतृगृहातून व प्रत्येक मजल्यावरुन बाहेर जाण्यासाठी, सार्वजनिक रहदारीच्या एकाच रस्त्यावर उघडत नसतील अशा दोन स्वतंत्र निर्गममार्गांची सोय करण्यात येईल आणि जेथे ५०० हून अधिक व्यक्तींसाठी आसनव्यवस्था असलेल्या श्रोतृगृहातून किंवा कोणत्याही मजल्यावरील आसनव्यवस्थेतून प्रत्येकी २५० व्यक्तींसाठी एक आणि जादा असलेल्या कोणत्याही कमी व्यक्तींसाठी एक या प्रमाणे निर्गममार्गांची सोय करण्यात येईल. प्रचलित विकास नियंत्रण नियमांनुसार, अशा प्रत्येक निर्गममार्गाची त्याच्या फळ्यांमधील रुंदी दार उघडे असताना १.५ मीटरपेक्षा कमी असणार नाही.

चित्रपटगृह संकुलाच्या बाबतीत, जर श्रोतृगृह एकमेकाला लागून असेल किंवा एकमेकांच्या बाजूला असेल तर प्रवेश आणि निर्गममार्ग श्रोतृगृहाच्या मागच्या बाजूस आणि रंगमंचाच्या/पडद्याच्या समोर वर विनिर्दिष्ट केलेल्या दारांजवळ असतील आणि निर्गममार्गांच्या विनिर्दिष्ट गरजा या वैयक्तिक पडद्यासंदर्भात न राहता संपूर्ण चित्रपटगृह संकुलासंदर्भात असतील ; "

(दोन) पोट-नियम (३) मध्ये पुढील पोट-नियम दाखल करण्यात येईल :—

" (३) जेथे ३०० पेक्षा अधिक व्यक्तींसाठी आसनव्यवस्था नसेल अशा कोणत्याही श्रोतृगृहासाठी किंवा कोणत्याही मजल्यासाठी १.२ मीटरचे दोन निर्गममार्ग पुरेसे असतील. हे निर्गममार्ग प्रचलित विकास नियंत्रण नियमांनुसार असतील. "

८. मुख्य नियमांच्या नियम १३ मध्ये पोट-नियम (४) ऐवजी पुढील पोट-नियम दाखल करण्यात येईल :—

" (४) पहिल्या रांगेत बसलेल्या व्यक्तीच्या डोळ्याच्या पातळीला समांतर अशा रेषेने चित्राच्या वरच्या उंचीपर्यंत केलेला कोन ५० अंशांपेक्षा जास्त नसावा. त्याचप्रमाणे दृश्यांच्या अगदी टोकापासून रांगेच्या विरूद्ध बाजूवरील कडेला असलेल्या व्यक्तीच्या डोळ्यांपर्यंत केलेला कोन २५ अंशापेक्षा कमी नसावा.

आयमॅक्स (आर), आय वेर्कस् (१५/७० मिमि, ८/७० मिमि आणि १०/७० मिमि) सारख्या मोठ्या प्रमाणित चित्रपटगृहांच्याबाबतीत, संबंधित यंत्रणा उत्पादकाच्या आवश्यकता व शिफारशी यांना मुभा देण्यात येईल. "

९. मुख्य नियमांच्या नियम १४ मध्ये पोट-नियम (१) ऐवजी पुढील पोट-नियम दाखल करण्यात येईल :—

नियम १४ मार्गिका- " (१) कुठलेही आसन मार्गिकेपासून १० आसनांपेक्षा अधिक दूर असणार नाही आणि मार्गिका कमीत कमी ०.९० मीटर रुंद असेल. चित्रपटगृहाची आसनक्षमता ३०० पेक्षा कमी असेल व दोन रांगांमधील अंतर कमीत कमी १.१२ मीटर (३ फूट ८ इंच) असेल तर मधल्या मार्गिकेची गरज नाही. परंतु चित्रपटगृहाची आसनक्षमता ३०० पेक्षा जास्त असेल तर मधली मार्गिका ठेवणे आवश्यक राहील. आयमॅक्स (आर), आय वेर्कस् (१५/७० मिमि, ८/७० मिमि आणि १०/७०मिमि) सारख्या मोठ्या प्रमाणित चित्रपटगृहांच्याबाबतीत, संबंधित यंत्रणा उत्पादकांच्या आवश्यकता व शिफारशी यांना मुभा देण्यात येईल . "

**टीप.**—३०० पेक्षा कमी आसन क्षमतेच्या चित्रपटगृहात मधली मार्गिका न ठेवण्यास परवानगी देताना परवाना प्राधिकारी आवश्यकतेनुसार सक्षम प्राधिकारी, सार्वजनिक बांधकाम विभाग/नगरपालिका प्राधिकारी/ अग्निशमन विभाग यांचे अभिप्राय घेईल व त्यानुसार आवश्यक उपाययोजना करील.

१०. मुख्य नियमांच्या नियम १८ मध्ये नियमांच्या शीर्षकामधील " हवा खेळती ठेवण्याची व्यवस्था " या मजकुराऐवजी पुढील मजकूर दाखल करण्यात येईल :—

**" वातानुकूलित नसलेल्या चित्रपटगृहांसाठी हवा खेळती ठेवण्याची व्यवस्था ".**

११. मुख्य नियमांच्या नियम २० मधील पोट-नियम (५) आणि (६) वगळण्यात येतील.

१२. मुख्य नियमांतील नियम २१ वगळण्यात येईल.

१३. मुख्य नियमांच्या नियम ४० मधील पोट-नियम (२) मध्ये " विद्युत अभियंता, महाराष्ट्र शासन " या मजकुराऐवजी " शासनाने वेळोवेळी अधिसूचित केलेला समुचित प्राधिकारी " हा मजकूर दाखल करण्यात येईल.

१४. मुख्य नियमाच्या नियम ४५ मध्ये,—

(अ) " वेष्टनिकेचा वापर करावयाचा असल्यास वेष्टनिका टणक अशा सागवानी लाकडाची असावी " या मजकुराऐवजी " वेष्टनिकेचा वापर करावयाचा असल्यास वेष्टनिका टणक अशा सागवानी लाकडाची अथवा पीव्हीसी अथवा जड प्रमापी प्रणाल (गॉज कॉन्डयूइट) पाईप्सची असावी " हा मजकूर दाखल करण्यात येईल.

(ब) " विद्युत अभियंता, महाराष्ट्र शासन " या मजकुराऐवजी " शासनाने वेळोवेळी अधिसूचित केलेला समुचित प्राधिकारी " हा मजकूर दाखल करण्यात येईल.

१५. मुख्य नियमांतील नियम ५१ वगळण्यात येईल.

१६. मुख्य नियमांच्या नियम ८२ मधील पोट-नियम (३) नंतर, पुढील पोट-नियम जादा दाखल करण्यात येईल,तो असा :—

" (४) उपखंड (१), (२) व (३) यामधील कोणतीही गोष्ट, विलेपकाने किंवा अन्य कोणत्याही बदललेल्या रुपाने सुसज्ज असलेल्या सिनेमागृहांना लागू असणार नाही ".

१७. मुख्य नियमांच्या नियम ८८ मध्ये अखेरीस पुढील मजकूर दुसरा परिच्छेद म्हणून जादा दाखल करण्यात येईल, तो असा :—

" कंपनीच्या बाबतीत, कंपनीच्यावतीने संचालकाला अर्ज करता येईल. "

१८. मुख्य नियमाच्या नियम १०० मधील पोट-नियम (८) नंतर पुढील पोट-नियम — जादा दाखल करण्यात येईल तो असा :—

" (९) चित्रपटगृहात प्रकरण - ५ नुसार आग विरोधी उपायोजना सुस्थितीत असल्याबाबत मुख्य अग्निशमन अधिकारी / अथवा संबंधित सक्षम प्राधिकाऱ्याने दिलेले प्रमाणपत्र ".

१९. मुख्य नियमांच्या नियम १०३ मध्ये पुढील परंतुक जादा दाखल करण्यात येईल :—

" परंतु, हा नियम, या नियमांखाली लायसन धारण करीत असलेल्या नोंदणीकृत कंपन्यांना लागू असणार नाही ".

२०. मुख्य नियमांच्या नियम १०९ ऐवजी, पुढील नियम दाखल करण्यात येईल, तो असा :—

" १०९. तिकिटविक्री इत्यादी लायसन प्राप्त तिकिटघरातूनच करणे.—

(१) लायसन प्राप्त तिकिटघरे दूरध्वनी बहुकेंद्रीत जागा आणि इंटरनेट किंवा नवे तंत्रज्ञान आणि अन्य खिडक्या, किऑस्क (मानव चलीत किंवा मानव विरहित) यांच्यामार्फतच तिकिटे इ. ची विक्री करावयाची:

परंतु, वर्गनिहाय आसनक्षमतेच्या किमान ७० टक्के तिकिटे, सिनेमागृहाच्या ठिकाणी असलेल्या लायसन प्राप्त तिकिटघरातून विक्री करण्यासाठी राखून ठेवण्यात येतील :

परंतु, असेही की, ज्याच्या मार्फत तिकिटविक्री करता येईल त्या जागा किंवा ती माध्यमे यांच्या संख्येवर कोणतेही निर्बंध असणार नाहीत.

(२) नियम १०८ अन्वये लायसन धारण करणारी प्रत्येक व्यक्ती, विहित प्राधिकारी यांनी मंजूर केलेले कोणतेही तिकिट किंवा पास किंवा प्रवेश करण्याचा अधिकार असल्याचा इतर कोणताही पुरावा, केवळ लायसन देणाऱ्या प्राधिकाऱ्याने मान्य केलेल्या व लायसनमध्ये विनिर्देश केलेल्या अशा तिकिटघरातून किंवा तिकिटघरांतून विकील किंवा विक्रीकरिता ठेवील, देऊ करील किंवा विक्रीसाठी मांडील आणि लायसन देणाऱ्या प्राधिकाऱ्याच्या लेखी पूर्वपरवानगीशिवाय तिकिटघराच्या जागेत बदल करण्यात येणार नाही :

परंतु, चित्रपटाच्या धर्मार्थ होणाऱ्या प्रयोगांसाठी किंवा इतर कोणत्याही पुरेशा करणाकरिता लायसनधारकास, कोणतीही तिकिटे, पास किंवा अन्य कोणतीही साधने विकण्याची लेखी परवानगी लायसन देणारा अधिकारी देऊ शकेल.

२१. मुख्य नियमांच्या नियम १०९ अ मध्ये,—

(अ) शीर्षकामध्ये " सात दिवसांच्या आधी " या मजकुराऐवजी " तीस दिवसांच्या आधी " हा मजकूर दाखल करण्यात येईल.

(ब) " सात दिवसांपेक्षा अगोदर " या मजकुराऐवजी " तीस दिवसांपेक्षा अगोदर " हा मजकूर दाखल करण्यात येईल.

२२. मुख्य नियमांच्या नियम १०९ (अ) अखेरीस पुढील मजकूर दुसरा परिच्छेद म्हणून जादा दाखल करण्यात येईल, तो असा :—

" परंतु, मुंबई करमणूक शुल्क नियम, १९५८ मधील नियम १९ अनुसार चित्रपटाच्या प्रयोगाच्या दिनांकापासून १० दिवसांत करमणूक शुल्क भरणे आवश्यक राहील ".

२३. मुख्य नियमांच्या नियम ११० मध्ये,—

" चित्रपटगृहाच्या आवारात किंवा तिकिटघरावर ठळकपणे दिसेल अशी " या मजकुराऐवजी " बहुकेंद्रित जागा, खिडक्या, किऑस्क (मानवचलित किंवा मानवविरहित), यामध्ये किंवा इंटरनेटवर किंवा " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल.

२४. मुख्य नियमांच्या नियम ११२ मध्ये पुढील परंतुक जादा दाखल करण्यात येईल, ते असे :—

" परंतु, बहुकेंद्रातील किंवा इंटरनेटवरील किंवा आरक्षण खिडकीवरील किंवा जाहिरात कक्षातील विक्रीसाठी असलेल्या तिकिटांची किंमत पूर्वमुद्रित करणे अनिवार्य असणार नाही, मात्र विकलेल्या प्रत्येक तिकिटावर किंमत छापलेली असेल अशा खिडक्यांवर विकलेल्या तिकिटांवर, आकारलेली किंमत, करमणूक कर आणि सेवा आकार व इतर कर, असल्यास, ते दर्शविण्यात येतील आणि त्यावर छापलेल्या किंमतीपेक्षा अधिक किंमत आकारली जाणार नाही. तसेच सेवाशुल्काखेरीज अन्य रक्कम घेतल्यास त्यावर करमणूक शुल्क आकारण्यात येईल ".

२५. मुख्य नियमांच्या नियम ११३ मध्ये,—

" तिकिटांचा साठा आणि हिशेबांच्या नोंदवह्या " या मजकुरानंतर " आणि तिकिटांचे संगणककीकृत अभिलेख व संगणकीकृत लेखा, असल्यास " हा मजकूर जादा दाखल करण्यात येईल.

२६. मुख्य नियमांच्या नियम ११४ मधील,—

(अ) पोट-नियम (१) मध्ये " पाचशे रुपयांपर्यंत " याऐवजी " पाच हजार रुपयांपर्यंत " हा मजकूर दाखल करण्यात येईल;

(ब) पोट-नियम (२) मध्ये, " दोनशे रुपयांपर्यंत " याऐवजी " दोन हजार रुपयांपर्यंत " हा मजकूर दाखल करण्यात येईल.

२७. मुख्य नियमांच्या नियम ११५ मधील पोट-नियम (२) व (३) ऐवजी पुढील पोट-नियम दाखल करण्यात येईल, तो असा :—

" (२) नियम १०८ अन्वये देण्यात येणाऱ्या लायसनकरिता किंवा त्याच्या नवीकरणाकरिता पुढील फी आकारण्यात येईल :—

| | रुपये |
|---|---|
| (अ) लायसन जर, ते देण्याच्या दिनांकानंतरच्या ३१ डिसेंबरपर्यंत पंधरा दिवसांपेक्षा अधिक असलेल्या मुदतीकरिता दिले असेल तर, | ५०० |
| (ब) लायसन जर, पंधरा दिवसांपेक्षा अधिक नाही इतक्या मुदतीकरिता देण्यात आले असेल तर, | ३०० |
| (क) लायसन जर, फक्त एका दिवसाकरिता देण्यात आले असेल तर, | १०० |
| (३) लायसनच्या दुसऱ्या प्रतीसाठी | २००. " |

२८. मुख्य नियमांच्या नियम ११६ मधील विद्यमान नियमाला पोट-नियम (१) असा नवीन क्रमांक देण्यात येईल, आणि असा क्रमांक दिलेल्या पोट-नियम (१) नंतर पुढील पोट-नियमांची भर टाकण्यात येईल, ते असे :—

" (२) लायसनधारक ही नोंदणीकृत कंपनी असेल किंवा भागीदारी संस्था असेल अशा बाबतीत नोंदणीकृत कंपनीने किंवा भागीदारी संस्थेने नामनिर्देशित केलेली व्यक्ती, ज्याला लायसन लागू आहे अशा चित्रपटगृहात उपस्थित राहील.

(३) पोट-नियम (१) व (२) यामधील कोणतीही गोष्ट बहुकेंद्र किंवा इंटरनेट तिकिट आरक्षणास लागू असणार नाही. "

२९. मुख्य नियमांच्या नियम ११७ मध्ये " चित्रपटगृहाच्या कार्यालयाच्या भिंतीवर ठळक जागी " या मजकुराऐवजी " बहुकेंद्री ठिकाणे, खिडक्या, किऑस्क (मानवचलित किंवा मानवविरहित) " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल.

३०. मुख्य नियमांच्या नियम १२१ मध्ये " किंवा प्रयोगाच्या किंवा चित्रपटाच्या मध्यंतरामध्ये " हा मजकूर ज्या दोन ठिकाणी आला आहे तो वगळण्यात येईल.

३१. मुख्य नियमांच्या नियम १२५ मध्ये " चलचित्रकाच्या सहाय्याने चित्रपट दाखवण्या-व्यतिरिक्त " या मजकुरानंतर " संगीत व नृत्याचे प्रयोग, इलेक्ट्रॉनिक व चलतचित्र संचावरुन प्रतिमांचे प्रक्षेपण आणि कॉन्फरन्स सुविधा " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल.

३२. मुख्य नियमांच्या नियम १२६ मध्ये " किंवा सिगारेट " या मजकुराऐवजी " शीत व गरम पेये " हा मजकूर दाखल करण्यात येईल.

३३. मुख्य नियमांच्या नियम १२८ मध्ये पुढील परंतुक जादा दाखल करण्यात येईल, ते असे :—

" परंतु, हा नियम नोंदणीकृत कंपनीला लागू असणार नाही. "

३४. मुख्य नियमांच्या नियम १२९ (अ) मध्ये पुढील नियम दाखल करण्यात येईल, तो असा :—

"१२९अ. **शास्ती** :—नियम ११६,११८ किंवा १२० यांच्या तरतुदींचे अनुपालन करण्यात कसूर करणाऱ्या किंवा त्यांचे उल्लंघन करणाऱ्या कोणत्याही व्यक्तीस, अपराधसिध्दीनंतर, दोनशे रुपयांपर्यंत असू शकेल एवढया दंडाची शिक्षा होईल आणि नियम १२१, १२२ किंवा १२६ यांच्या तरतुदींचे अनुपालन करण्यात कसूर करणाऱ्या किंवा त्यांचे उल्लंघन करणाऱ्या व्यक्तीस, अपराधसिध्दीनंतर, पाचशे रुपयांपर्यंत असू शकेल एवढया दंडाची शिक्षा होईल. "

३५. मुख्य नियमांच्या नियम १३०-क मध्ये " रुपये ३७.५० " या मजकुराऐवजी " रुपये १,००० " हा मजकूर दाखल करण्यात येईल.

३६. मुख्य नियमांना जोडलेल्या नमुना " ई " मध्ये, " अटी व निर्बंध " या शीर्षका-खालील,--

(क) उपखंड ८ ते १६ वगळण्यात येतील.

(ख) उपखंड (२९) ऐवजी पुढील उपखंड दाखल करण्यात येईल तो असा :—

" (२९) हे लायसन हस्तांतरणीय नाही आणि लायसनदाराने कोणत्याही व्यक्तीस त्याचे हस्तांतरण केल्यास ते निलंबित किंवा रद्द केले जाण्यास पात्र होईल. "

" परंतु, हा उपखंड नोंदणीकृत कंपन्यांना लागू असणार नाही. "

(ग) उपखंड १७ ते ३१ यांना अनुक्रमे उपखंड ८ ते २२ असे नवीन क्रमांक देण्यात येतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**सुरेश महाजन,**
शासनाचे सह सचिव.

## HOME DEPARTMENT

Mantralaya, Mumbai 400 032, dated 22nd July 2004.

BOMBAY CINEMAS (REGULATION) ACT, 1953.

No.BCR. 5399/114/SPL-5.—In exercise of the powers conferred by sub-section (*1*) and clauses (a),(b) and (c) of sub-section (*2*) of section 9 of the Bombay Cinemas (Regulation) Act, 1953 (Bom.XI of 1953), and of all other powers enabling it in that behalf, the Government of Maharashtra hereby makes the following rules further to amend the Maharashtra cinema(Regulation) Rules, 1966. The same having been previously published as required by sub-section (*4*) of the said section 9 namely :—

1. These rules may be called the Maharashtra Cinemas (Regulation) (First Amendment) Rules, 2004.

2. These Rules shall come into force from the date of publication in the *Official Gazette*.

3. In rule 2 of the Maharashtra Cinemas (Regulation) Rules, 1966 (hereinafter referred to as the " the principal rules"), for clause (f), the following shall be substituted, namely :—

"(f) "licensee" or "holder of licence" includes the manager or managers or a person nominated under rule 116 by the registered company or a partnership firm or a body corporate".

4. In rule 3 of the principal rules, for sub-rule (1), the following sub-rule shall be substituted, namely :—

"(1) No person under 18 years of age shall be entitled to obtain or hold any licence under these Rules. In case of a Company, the Executing director of the Company shall make an application on behalf of the Company to obtain or hold any licence under these Rules."

5. In rule 6 of the principal rules, after sub-rule (3), the following sub-rule (4), shall be added, namely :—

"(4) No application for building permission for cinemas shall be made under Development Control Regulations (DCR) unless the No Objection Certificate under rule 6 is accompanied with such application.".

6. In rule 9 of the principal rules,—

(1) for sub-rule (1), the following sub-rule shall be substituted namely :—

"(1) Cinema shall not be built in a manner where the lowest level of floor thereof is higher than 50ft. from the ground level.".

(2) sub-rule (2) and (5A) shall be deleted.

(3) sub-rules (3),(4),(5) and (6) shall be renumbered as sub- rules (2), (3), (4) and (5) respectively.

7. In rule 12 of the principal rules,—

(*i*) for sub-rule (1), the following sub-rule shall be substituted, namely :—

"(1) Two separate exits not opening on the same throughfare of public passage shall be provided from the front of the stage/screen and from the auditorium floor and from every tier, which accommodates not more than 500 individuals; and where the auditorium floor or any tier accommodates more than 500 individuals, exits shall be provided at the rate of one for every 250 individuals and one for any less number in excess. Each of such exits shall be of not less than 1.5 meter width and shall be in accordance with the prevalent Development Control Rules between the leaves of the door when open.

In case of Multiplexes, if the auditoriums are adjoining each other or side by side, the entrances and exits shall be from the rear of the auditorium and from the front of the stage/screen at the above specified gates and the exit requirements specified shall be with reference to the whole cinema complex and not the individual screen.";

(*ii*) in sub-rule (3), the following sub-rule shall be substituted, namely :—

"(3) For any auditorium floor or any tier, which does not accommodate more than 300 individuals, two 1.2 meter exits may be sufficient. The exit may be provided as per the prevalent Development Control Rules.".

8. In rule 13 of the principal rules, for sub-rule (4), the following sub-rule shall be substituted, namely :—

"(4) The angle substended by a line drawn horizontal from the eye level of the person sitting in the first row to the top of the picture height should not be greater than 50 degrees. Also the angle substended from the extreme edge of the picture to the eye of the person sitting at the opposite end of the row should not be less than 25 degrees.

For the purposes of Large Format Cinemas like IMAX (R), I-WERKS (15/70mm., 8/70mm., 10/70mm.) requirement and recommendations of system manufacturers shall be allowed.".

9. In rule 14 of the principal rules, for sub-rule (1), the following sub-rule shall be substituted, namely :—

"(1) No seat shall be more than 10 seats away from the gangway and the gangway should be at least 0.90 meter wide. If the seating capacity of the Cinema is less than 300 seats and if at least 1.12 meters (3 feet 8 inches) spacing between the rows is provided then no central gangway is required. However if the seating capacity of the Cinema exceeds 300 seats then provision of central gangway is required. In case of Large Format Cinemas like IMAX (R), I-WERKS (15/70mm., 8/70mm., and 10/70mm.), the system manufacturers requirements and recommendations shall be allowed.

*Note.*— While according sanction for not having a central gangway in a cinema having a seating capacity of less than 300 seats the Lincencing Authority as it may deem fit, take a decision in the case after obtaining the opinion of the Appropriate Authority, Public Works Department, Municipal Authorities/ Fire Brigade.

10. In rule 18 of the principal rules, in the head-note of the rule, for the word "Ventilation" the following words shall be substituted, namely :—

" Ventilation for Non-Air Conditioned theaters ".

11. In rule 20 of the principal rules, sub-rules (5) and (6) shall be deleted.

12. Rule 21 of the principal rules shall be deleted.

13. In rule 40 of the principal rules, in sub-rule (2), for the words "the Electrical Engineer to Government" the words "an appropriate authority notified by the Government from time to time," shall be substituted.

14. In rule 45 of the principal rules,—

(*a*) for the words, "If casing be used it shall be hard teak wood " the words "If casing is to be used, it shall be hard teak wood or PVC or heavy gauge conduit pipes" shall be substituted;

(*b*) for the words "the Electrical Engineer to Government" the words "an appropriate authority notifed by the Government from time to time," shall be substituted.

15. Rule 51 of the principal rules shall be deleted.

16. In rule 82 of the principal rules, after sub-rule (3), the following sub-rule shall be added, namely :—

"(4) Nothing in sub-rules (1),(2) and (3) shall apply to cinemas equipped with platter or any other modified form.".

17. In rule 88 of the principal rules, the following shall be added at the end as second paragraph, namely :—

"In case of a company the application shall be made by a director on behalf of the Company.".

18. In rule 100 of the principal rules, after sub-rule (8) the following sub-rule shall be added, namely :—

"(9) As per the provisions laid down in Chapter 5 of the Cinema Rules the Chief Fire Officer or the Appropriate Authority shall issue a certificate regarding working condition of the fire prevention equipment. "

19. In rule 103 of the principal rules, the following proviso shall be added, namely :—

"Provided that, this rule shall not apply to a registered company holding a license under these rules.".

20. For rule 109 of the principal rules, the following rule shall be substituted, namely :—

"109. Tickets, etc. to be sold only at licensed booking office,—

(1) Tickets, etc., to be sold only at licensed booking offices, through telephone multipoint locations and internet or emerging technologies and other counters, kiosks (manned or unmanned):

Provided that, at least 70 per cent. of the tickets classwise shall be reserved for sale at the licensed booking office at the cinema:

Provided also that, there shall not be any restrictions on the number of locations or medium through which the tickets can be sold.

(2) Every person approved by the appropriate authority holding the license under rule 108 shall sell, keep, offer or expose for sale any ticket or pass or any other evidence for admission only at the booking office or booking offices as approved by the licensing authority and specified in the license and no change in the location of the same shall be made except with the previous permission in writing of the licensing authority :

Provided that, the licensing authority may, in case of charitable shows or for any other sufficient reason, permit in writing the sale of tickets, passes or any other means to the licensee.".

21. In rule 109 A of the principal rules,—

(*a*) in the head-note, for the words "earlier than seven days" the words "earlier than thirty days" shall be substituted ;

(*b*) for the words, "cinema earlier than seven days" the words "cinema earlier than thirty days" shall be substituted.

22. In rule 109 (A) of the principal rules the following shall be added at the end as second paragraph, namely :—

" However as per Rule 19 of the Bombay Entertainment Duty Rules, 1958 it shall be mandatory to pay the Entertainment Duty within 10 days after the date of the show."

23. In rule 110 of the principal rules, after the words "conspicuous manner in the cinema premises or" the words "at multipoint locations, counters, kiosks (manned or unmanned), or on the internet or" shall be inserted.

24. In rule 112 of the principal rules, the following proviso shall be added, namely :—

"Provided that, for multipoint or internet sale or booking sale counter or kiosks it is not mandatory to preprint the price of ticket, but the price will be printed on every ticket sold. The tickets sold through such counter will display price charged, entertainment tax and service charges and other taxes, if any, and shall not charge in excess of the price printed thereon. So also entertainment tax shall be charged on any amount taken other than service charge. ".

25. In rule 113 of the principal rules, after the words "stocks of tickets and registers of accounts" the words "and computerised record of tickets and computerised accounts, if any" shall be added.

26. In rule 114 of the principal rules,—

(*a*) in sub-rule (1), for the words " five hundred rupees" the words " five thousand rupees" shall be substituted;

(*b*) in sub-rule (2), for the words " two hundred rupees" the words " two thousand rupees" shall be substituted.

27. In rule 115 of the principal rules, for sub-rules (2) and (3), the following sub-rules shall be substituted, namely :—

"(2) the following fees shall be levied for the licence granted under rule 108 or for its renewal :—

(*a*) if the license is granted for a period exceeding a fortnight upto 31st December following the date of issue, .... Rs. 500

(*b*) If the license is granted for a period not exceeding a fortnight, ... Rs. 300

(*c*) If the license is granted only for a day, ... Rs. 100

(3) the fee for duplicate license shall be ...Rs. 200."

28. In rule 116 of the principal rules, the existing rule shall be numbered as sub-rule (1) thereof; and after sub-rule (1) so numbered, the following sub-rules shall be added, namely :—

"(2) In case where the licensee is a registered company, or a partnership firm, a person nominated by such registered company or partnership firm, shall remain present at the cinema to which the licensee applies;

(3) Nothing in sub-rules (1) and (2) shall apply to the multipoint or internet ticket booking.".

29. In rule 117 of the principal rules, after the words "prominent place in the cinema theater" the words "multipoint locations, counters, kiosks (manned or unmanned)" shall be inserted.

30. In rule 121 of the principal rules, the words "or in the interval of the performance or exhibition" occurred at two places shall be deleted.

31. In rule 125 of the principal rules, after the words "exhibition of cinematograph films" the words "musical and dance performances, display of electronic and video transmitted images and conference facilities" shall be inserted.

32. In rule 126 of the principal rules, for the words "or cigarettes" the words "cold and hot drinks" shall be substituted.

33. In rule 128 of the principal rules, the following proviso shall be added, namely :—

"Provided that, this rule shall not apply to a registered company.".

34. For rule 129-A of the principal rules, the following rules shall be substituted, namely :—

"129-A. *Penalty.*—Any person failing to comply with or contravening the provisions of rules 116, 118 or 120 shall, on conviction, be punished with fine which may extend to two hundred rupees, and failing to comply with or contravening the provisions of rules 121, 122 or 126 shall, on conviction be punished with fine which may extend to five hundred rupees".

35. In rule 130-C of the principal rules, for the letters and figures, "Rs.37.50" the letters and figures "Rs.1,000" shall be substituted.

36. In Form E appended to the principal rules, under the heading Conditions and Restrictions,—

(*a*) sub-clauses 8 to 16 shall be deleted;

(*b*) for sub-clause (29), the following sub-clause shall be substituted, namely :—

"(29) This licence is not transferable and in case, the licensee transfers the same to any person the licence is liable, to be suspended or cancelled ;

(*c*) Sub-clauses 17 to 31 shall be renumbered as sub-clauses 8 to 22 respectively :

Provided that, this sub-clause shall not apply to a registered company.".

By order and in the name of the Governor of Maharashtra,

SURESH MAHAJAN,
Joint Secretary to Government.

शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई.